**संचालक, महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी, नाशिक यांच्या आस्थापनेवर वित्तीय सल्लागार (महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील उपसंचालक दर्जाचा अधिकारी) व लेखाअधिकारी (गट-अ) यांचे पद निर्माण करण्यास मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अेपीओ-०२१६/प्र.क्र.६५/पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई
दिनांक : ०२ ऑगस्ट, २०१८.

<u>वाचा</u> :-

१) गृह विभाग शासन निर्णय क्र.टिईएक्स-०३०५/प्र.क्र.१०५/पु.बां.२०३/पोल-५अ, दि.०५.०२.२०१६.
२) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांचे पत्र क्र.मपोअ/आस्था-१/स्वायतत्ता/२०१६-२८५२, दि. २१.०४.२०१६.
३) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांचे पत्र क्र.मपोअ/आस्था-१/स्वायतत्ता/२०१६-४०८३, दि.१८.०६.०१६.
४) मा. उच्चस्तर सचिव समितीचे दिनांक १९.०५.२०१७ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी, नाशिक या पोलीस प्रशिक्षण केंद्रास उपरोक्त संदर्भाधिन क्र.१ येथे नमूद दिनांक ५ फेब्रुवारी, २०१६ च्या शासन निर्णयान्वये स्वायत्त संस्थेचा दर्जा दिला असून ही संस्था पोलीस दलाची शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून कार्यरत राहील असा निर्णय घेतला आहे. महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी, नाशिक या संस्थेचे वार्षिक अंदाजपत्रक सुमारे रु.६५ कोटी इतके आहे. कामाचा वाढता व्याप, आर्थिक व्यवहार, वित्तीय जबाबदारी व शासनाने घेतलेला धोरणात्मक निर्णय इ. बाबी लक्षात घेता संस्थेची लेखा विषयक बाबी हाताळण्याची जबाबदारी मोठया प्रमाणावर वाढणार आहे. यास्तव लेखाविषयक बाबी काटेकोरपणे हाताळता यावीत यासाठी संचालक, महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी, नाशिक यांच्या आस्थापनेवर वित्तीय सल्लागार (महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील उपसंचालक दर्जाचा अधिकारी) व लेखाअधिकारी (गट-अ) हे पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

संचालक, महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी, नाशिक यांच्या आस्थापनेवर खालील तक्त्यात नमूद पदे निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १. | वित्तीय सल्लागार (महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील उपसंचालक दर्जाचा अधिकारी) | रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे रु.६६०० | ०१ |
| २. | लेखाअधिकारी (गट अ) | रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे रु. ५४०० | ०१ |
| | | **एकुण पदे -** | **०२** |

२. उपरोक्त तक्त्यात नमूद पदे महाराष्ट्र लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राष्ट्र, मुंबई यांच्याकडून प्रतिनियुक्तीने भरण्यात यावीत.

३. उपरोक्त पदांच्या निर्मितीसाठी येणारा आवर्ती व अनावर्ती खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३४७/१६/व्यय-७, दिनांक ०४.०७.२०१६ व मा. उच्चस्तर सचिव समितीने दिनांक १९.०५.२०१७ रोजी झालेल्या बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०२१५०३४७७५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2018.08.02 15:06:02 +05'30'

**( दिनेश आ. सस्ते )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.

३. मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव.
४. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मुंबई.
६. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
९. संचालक, महाराष्ट्र लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई.
१०. पोलीस आयुक्त, नाशिक शहर.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), १/२, मुंबई/नागपूर.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,वांद्रे,मुंबई.
१५. कार्यासन अधिकारी, व्यय-७, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती, पोल-३.